D:\shubhangi\prs-2\september04 gr c.r.93

**कारागृह व न्यायालयात व्हिडीओ कॉन्फरसिंग यंत्रणा स्थापन करणेसाठी " प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमआयएस २००१/प्र.क्र.१३/पीआरएस-२.**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:- १६ सप्टेंबर, २००२.**

वाचा:-१) गृह विभाग,शासन निर्णय,क्र.एमआयएस ०१२०/१३(४५)/पीआरएस-२, दिनांक १३ नोव्हेंबर २०००.

२) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.सीओएम १००१/प्र.क्र.१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दिनांक २९.१०.२००१.

**शासन निर्णय** -न्यायालय व कारागृहामध्ये संपर्क साधणे प्रत्येक कैदयांना न्यायालयापुढे सुनावणीकरिता हजर राहण्याकरिता पोलीस यंत्रणेवर पडणारा ताण कमी करण्यासाठी व्हिडीओ कॉन्फरसिंग यंत्रणा स्थापन करण्यासाठी येणाऱ्या खर्चाबाबत व त्यासाठी कराव्या लागणाऱ्या न्यायिक प्रक्रियेचा विचार व अभ्यास करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये एक समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने दिलेला अहवाल व त्यानुषंगाने वित्त व माहिती तंत्रज्ञान विभागाने दिलेला सल्ला लक्षात घेऊन विभागाने सदर यंत्रणा प्रथमतः प्रायोगिक तत्वावर राज्यातील मुंबई,भायखळा, व ठाणे येथील कारागृहात व त्यांच्या परिसरातील न्यायालयात भाडे तत्वावर (लीज ) राबविण्याबाबत निर्णय घेतला असून भाडे तत्वावर सदर यंत्रणा स्थापन करण्यासाठी व त्याचा निश्चित खर्च कळण्यासाठी यासंदर्भात आंध्रप्रदेश राज्याने केलेली निविदा प्रक्रिया तसेच न्यायालयात यापूर्वी झालेली प्रात्यक्षिके याचा आधार घेवून कारागृह महानिरीक्षक पुणे यांनी माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या सहकार्याने निविदेचा मसुदा तयार केलेला आहे. त्यानुषंगाने सदर यंत्रणा स्थापन करण्यासंदर्भात पुढील कार्यवाही करण्यासाठी संदर्भाधीन दि. २९.१०.२००१ च्या शासन निर्णयानुसार प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार न्यायालय व कारागृहामध्ये व्हिडीओ कॉन्फरसिंग यंत्रणा स्थापन करण्यासंदर्भात निविदेचा मसुदा अंतिम करणे, प्राप्त निविदेतील तांत्रिक /आर्थिक माहितीची छाननी करणे, प्रकल्प कर्त्याची निवड करणे, प्रगतीचा आढावा घेणे इत्यादीसाठी. तसेच प्रकल्पाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी "**प्रकल्प अंमलबजावणी समिती**" स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर समितीमध्ये संदर्भाधीन दि.१३ नोव्हेंबर २००० च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेली समिती विलीन करण्यात येत आहे. त्यानुषंगाने **प्रकल्प अंमलबजावणी समितीची रचना व कार्यकक्षा** खालीलप्रमाणे राहील.

**"प्रकल्प अंमलबजावणी समिती"**

| | |
|---|---|
| १) अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२. | पदसिध्द अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव (तुरुंग), गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२. | स्थायी सदस्य |
| ३) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२. | --"-- |
| ४) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२. | --"-- |
| ५) प्रधान सचिव (विधी), विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-३२. | --"-- |
| ६) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई-३२. | --"-- |
| ७) सचिव (माहिती व तंत्रज्ञान),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२. | --"-- |

८) प्रबंधक, (अपिल शाखा) उच्च न्यायालय,मुंबई-३२. --"--
९) श्री. मोइज हुसेन ,एस.आय.ओ.एन.आय.सी.मुंबई आमंत्रित सदस्य
१०) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे. सदस्य सचिव

<u>समितीची कार्यकक्षा</u>

१) निविदेचा मसुदा अंतिम करुन त्यास मान्यता देणे.
२) या प्रकल्पासाठी प्राप्त झालेल्या निविदामधील तांत्रिक/आर्थिक माहितीची छाननी करुन प्रकल्प कर्त्याची अंतिम निवड करणे.
३) व्हिडीओ कॉन्फरन्सिंग यंत्रणा स्थापन करण्यासंदर्भात वेळोवेळी समितीच्या बैठकीचे आयोजन करुन प्रगतीचा आढावा घेणेसाठी समितीस माहिती सादर करणे. याची जबाबदारी सदस्य सचिव या नात्याने कारागृह महानिरीक्षक, पुणे यांची राहील.
४) सदर यंत्रणा स्थापन करणेबाबत येणाऱ्या अडचणीबाबत मार्गदर्शन करणे व योग्य तो निर्णय घेणे.

सदर समिती संदर्भाधीन दि.२९.१२.२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेल्या कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यास जबाबदार राहील. सदर यंत्रणा स्थापन करण्यासंदर्भात प्रकल्प अंमलबजावणी समितीने निविदेचा मसुदा अंतिमतः मान्य केल्यानंतर निविदा मागविणे इत्यादींबाबतची पुढील कार्यवाही कारागृह महानिरीक्षक पुणे यांच्यामार्फत केली जाईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(signature)

(का. ना. [illegible])
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,
~~१) अ.मु.स.(गृह) गृह विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.~~
१) अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
२) प्रधान सचिव (तुरुंग), गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
३) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
४) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
५) प्रधान सचिव (विधी), विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
६) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग,उर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
७) सचिव (माहिती व तंत्रज्ञान),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
८) प्रबंधक, (अपिल शाखा) उच्च न्यायालय,मुंबई-३२.
९) श्री. आमंत्रित सदस्य,मोइज हुसेन ,एस.आय.ओ.एन.आय.सी.मुंबई
१०) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
१२) कारागृह उपमहानिरीक्षक,दक्षिण विभाग,मुंबई.
१३) निवडनस्ती.